

PRATHAM BOOKS

A Book in Every Child's Hand

# मसाला चहा

**Author:** Tanya Luther Agarwal
**Illustrator:** Sanjay Sarkar
**Translator:** Sucheta Kadethankar

वाचन पातळी ४



दक्षिण भारतातल्या एका छोट्याशा खेड्यात एक मुलगी राहायची. तिचं नाव बुलबुली. बुलबुली तिच्या आईबरोबर एका झोपडीत राहायची. तिच्या झोपडीभोवती उंचच उंच झाडांची दाटी होती. धुक्याचे दिवस आले की टप्पोरे दवबिंदू झाडांच्या पानांवर पडायचे आणि चमकायचे. बुलबुली तिच्या नावाला शोभेल अशीच एकदम उत्साही आणि चपळ मुलगी होती. दिवसभर तिच्या मित्र-मैत्रिणींबरोबर ती गावाभोवती पसरलेल्या जंगलात भटकत राहायची. पहाटेच्या वाऱ्याबरोबर दररोज सकाळी जंगलाचा वास दरवळायचा, तेव्हा मोठ्ठा श्वास भरून वास घ्यायला तिला फार आवडायचं. वाऱ्याबरोबर कधी-कधी तिला एकदम मधुर सुवास यायचा. तर कधी एखादा उग्र वास. काही वेळा तर तिला खूप ओळखीच्या फुलांचा सुवास यायचा.



या सगळ्या उत्साह वाढवणाऱ्या सुगंधी वाऱ्यांमुळे जाग आली, की दिवस कसा मजेत जायचा. बुलबुलीचा एक खास मित्र होता. तोताराम नावाचा पोपट. तोताराम रोज सकाळी कुठूनसा उडत-उडत यायचा आणि तिच्या झोपडीसमोरच्या झाडावर बसून तिला जंगलातल्या मजेदार गोष्टी सांगायचा. दूर देशांमधल्या त्याच्या सफरींच्या, तिथे राहाणाऱ्या लोकांच्या, अनेक कहाण्या तो तिला सांगायचा.

बुलबुलीला तोतारामच्या गोष्टी ऐकायला फार आवडायचं. तोतारामनं वर्णन केलेल्या सर्व ठिकाणी जाण्याची आणि त्यांची शोभा पाहण्याची तिला खूप इच्छा व्हायची. तोतारामचं बोलणं ऐकताना तिचं मन वेगानं धावू लागायचं. पण गोष्ट संपली, की ती निराशेचा मोठ्ठा निःश्वास टाकायची.



आपण आजपर्यंत साधं 'विचित्ररूप स्थळ' सुद्धा पाहिलेलं नाही, तर दूरदेशी जाण्याची स्वप्नं बघण्यात तरी काय अर्थ? तिच्या गावातला प्रत्येक माणूस या विचित्ररूप स्थळाबद्दल बोलायचा.

आसपासच्या गावांतले काही लोक त्या ठिकाणी जाऊन आले होते. पण तिच्या गावामधून आजपर्यंत कोणीच या ठिकाणी गेलं नव्हतं. ऐकीव गोष्टींवरून तरी हे स्थळ गूढरम्य वाटायचं. तिथे गेल्यावर नक्कीच काही अविस्मरणीय अनुभव मिळणार, याची बुलबुलीला खात्री होती.





एक दिवस बुलबुलीनं तोतारामची बराच वेळ वाट पाहिली. पण त्याची शीळ काही आली नाही. तिनं कोंबड्यांना खुराक दिला. त्यांची अंडी गोळा केली. त्यानंतर गाईंना चारा देऊन त्यांचं दूधसुद्धा काढून झालं. हे सगळं करताना मधेच ती थांबून तोतारामच्या शिट्टीचा अंदाज घेत होती.

शेवटी, वाट बघून कंटाळल्यावर ती शाळेला निघून गेली. तिच्या शाळेतले सगळे विद्यार्थी एका मोठ्या वडाच्या झाडाखाली बसत. त्या दिवशी शाळेत बुलबुलीचं अजिबात लक्ष नव्हतं. तिची नजर सारखी तोतारामला शोधत होती.

त्यांची मैत्री झाल्यापासून एकही दिवस तोताराम तिला भेटल्याशिवाय गेला नव्हता.



अनेक दिवस निघून गेले. बुलबुलीला आता तोतारामची अजूनच काळजी वाटू लागली.

तोतारामला काही दुखापत तर झाली नसेल, असा विचार तिच्या मनात येऊ लागला. त्याची हालहवाल जाणून घेण्यासाठी तिच्याकडे काहीच मार्ग नव्हता. दिवसांगणिक बुलबुलीची काळजी वाढतच गेली. शाळा संपली, की ती तोतारामला आवाज देत जंगलांमधून फिरत असे.

तोंडावर हाताची ओंजळ धरून ती, "तोताराम.... तू कुठे आहेस?'' अशा जोरजोरात हाका मारीत असे. पण व्यर्थ. काहीच प्रतिसाद येत नसे.



एके दिवशी, भल्या पहाटे, सूर्योदयापूर्वी तिनं एका थकलेल्या पक्ष्याचा आवाज ऐकला. तिनं घाई-घाईनं अंथरुणातून उठून पाहिलं, तर तो तोताराम होता. “बुलबुली, ऊठ. मला तुझ्याशी बोलायचंय."

बुलबुलीनं हात पसरला आणि तोताराम तिच्या खांद्यावर येऊन बसला.
“तोताराम, कुठे होतास तू? मी किती काळजीत होते! काय झालं आहे? तू इतका नाराज का दिसतो आहेस?"
“बुलबुली, विचित्ररूप स्थळ धोक्यात आहे. जंगलामध्ये युद्ध सुरू झालंय."
“तोताराम, शांत हो. नाहीतर सगळं गाव जागं होईल. काय बोलतो आहेस तू? आणि युद्ध कोणामध्ये सुरू आहे?" चिंतातुर होऊन बुलबुलीनं विचारलं.

“जंगलांमध्ये... अरे बापरे.... माफ कर. मी ओरडणं थांबवायला हवं... जंगलांमध्ये युद्ध सुरू झालं आहे. विचित्ररूप स्थळ आता पूर्वीसारखं राहिलं नाही. सगळे प्राणी बिथरून गेले आहेत. पुढे काय होणार याची कोणालाच कल्पना नाही. बुलबुली, आपण काहीतरी करायला हवं,'' तोताराम उतावीळपणे म्हणाला.

“मला अजूनही कळत नाहीये. जंगलामध्ये युद्ध कसं होईल? तू मला विचित्ररूप स्थळाकडे घेऊन का जात नाहीस?" बुलबुलीनं विचारलं.



तोताराम अधिकच अस्वस्थ झाला. “विचित्ररूप स्थळ तुझ्या गावापासून दोन दिवस आणि दोन रात्र लांब आहे. तुझ्या इवल्याशा पावलांमध्ये तिथपर्यंत जाण्याची ताकद कुठून येणार?"

“माझी इच्छाशक्ती माझ्या पावलांपेक्षा मोठी आहे, तोताराम. माझ्या पावलांच्या आकारावर जाऊ नकोस. मला मुळीच कशाची भीती नाही. शिवाय प्रयत्न करणं तर माझ्या हातात आहेच."

“बुलबुली, हा प्रवास खूप मोठा आणि खडतर आहे. मला तुझी खात्री वाटत नाही," तोतारामनं आपली चिंता व्यक्त केली.



“असो. मला तरी याखेरीज मदतीचा कोणता मार्ग दिसत नाही. तू मला विचित्ररूप स्थळाकडे न्यायलाच हवंस," बुलबुलीनं तोतारामची विनवणी केली.
तोतारामनं बराच वेळ विचार केला. शेवटी थोडंसं नाराज होऊनच त्यानं बुलबुलीचं म्हणणं मान्य केलं.
“ठीक आहे तर; पण आपल्याला लगोलग निघावं लागेल."
पण आईला न सांगता कसं जाणार? तोतारामनं उपाय सुचवला. रस्त्यात तोतारामची मैत्रीण कोकिळा भेटली, तर तिच्याकडे आईसाठी निरोप देण्याचं ठरलं.



“चल आता लवकर. वेळ वाया नको घालवायला," तोतारामनं घाई केली.

अशा तऱ्हेने ते निघाले. तोताराम बुलबुलीच्या डोक्यावर उडत-उडत रस्ता दाखवत होता. बुलबुली अनेक तास चालत होती. तिला उंच-उंच गवत आणि दाट  झाडांमधून चालण्याची सवय होती. पण आता तिला भूकही लागली आणि ती थकूनसुद्धा गेली. तिला खाण्याची आणि पाण्याची गरज असल्याचं तोतारामला जाणवलं.

“अजून थोडाच वेळ हं, बुलबुली. पुढे नारळाची झाडं आहेत," तोताराम म्हणाला. नारळाच्या झाडांजवळ गेल्यावर तोतारामनं एक जोरदार शीळ घातली. अचानक कुठूनतरी एक खट्याळ माकड आलं.



“थोडा शांत हो, बंदरू! माझं काम आहे तुझ्याकडे. उड्या  मारणं थांबव."

“ठीक आहे, तोताराम. काय काम आहे?"

“एक-दोन शहाळी तोडून झाडावरून खाली टाक. माझ्या मैत्रिणीला, बुलबुलीला भूक लागली आहे," तोतारामनं सांगितलं.
बंदरूने लगेच तोतारामचं ऐकलं. त्यानं झाडावरून तीन शहाळी खाली टाकली. जमिनीवर पडताच ती फुटली. बुलबुलीनं लगेच शहाळ्यांकडे धाव घेतली आणि त्यामधून मलई खायला सुरुवात केली. तिचं खाऊन होईपर्यंत बंदरू झाडावरून आनंदानं ओरडत राहिला.

“धन्यवाद, बंदरू! माझं पोट भरलं," बुलबुली म्हणाली.

“माझ्या दोस्तांनो, मला केव्हाही बोलवा. मी जंगलातला सर्वांत तरबेज गोलंदाज आहे," बंदरू उत्साहानं म्हणाला.



तोताराम आणि बुलबुलीनं त्यांचा पुढचा प्रवास सुरू केला. पुन्हा बऱ्याच तासांनंतर बुलबुली थकली. पण तिची मोहीम मात्र सुरूच होती. तिला आयुष्यातली एक दुर्मिळ संधी मिळाली होती. तिच्या गावातल्या लोकांसाठी, विचित्ररूपची भेट म्हणजे जणू तीर्थयात्राच होती.

जेव्हा-जेव्हा थकल्यासारखं वाटायचं, तेव्हा-तेव्हा बुलबुली स्वतःच्या मनात विचित्ररूप स्थळाचं चित्र उभं करायची. लोकांना अमर्याद आनंद देणाऱ्या एका स्थळाची तिनं कल्पना केली होती. या कल्पनेमुळेच चालण्याचे कष्ट ती विसरून जात होती.

त्यांच्या प्रवासाची पहिली संध्याकाळ झाली. ‘अजून एक दिवस’, बुलबुलीच्या मनात आलं. बुलबुली एका झाडाखाली झोपली, तर तोतारामनं त्याच झाडाच्या फांदीवर एक सोयीची जागा शोधली. पहाट झाली. हजारो पक्ष्यांच्या किलबिलाटामुळे बुलबुलीला जाग आली. अनेक मोठमोठे श्वास घेऊन, हात पसरून, आळस देऊन बुलबुली जागी झाली. ती सकाळ काही वेगळीच होती. दररोज पहाटे येणारे सगळे सुगंध आज अजूनच तीव्रतेनं येत होते आणि नेहमीपेक्षा जास्त उत्साह देत होते.

“तोताराम, तुला या हवेमधल्या ताजेपणाचा वास येतो आहे? मला हा वास फार आवडतो," बुलबुली म्हणाली.

“हा सुगंध भरून घेण्यासाठी तुझ्याकडे सगळा दिवस आहे. चल, निघूयात,"
तोतारामनं जणू आज्ञाच सोडली.
तोताराम आणि बुलबुलीनं दुसऱ्या दिवशी फार कमी गप्पा मारल्या. बुलबुली अधिकच थकलेली, भुकेलेली आणि तहानलेली असल्याचं तोतारामला जाणवत होतं.

तोताराम थोडासा खाली, तिच्या खांद्याजवळ उडत आला आणि म्हणाला, “इथे जवळच एक झरा आहे. आपण झऱ्याकाठी थोडी विश्रांती घेऊ."

थोड्याच वेळात बुलबुलीला खळाळत्या पाण्याचा आवाज येऊ लागला. लगेचच ते झऱ्याजवळ पोहोचले. झऱ्याचं स्वच्छ पाणी सूर्यप्रकाशामध्ये चमकत होतं. जणू काही स्वतःशीच स्पर्धा केल्याप्रमाणे पाणी कुठेतरी वाहत निघालं होतं. ते अप्रतिम दृश्य होतं. थोडंसं खाली झुकून बुलबुलीनं ओंजळीतून शक्य तेवढं पाणी पिऊन घेतलं. तोंडावर पाण्याचा हबका मारून ती ताजीतवानी झाली. तिचं पाणी पिऊन झाल्यावर, तिच्याजवळ येऊन तोतारामनं तिला हात पुढे करायला सांगितलं. बुलबुलीच्या हातावर त्यानं लालबुंद, चविष्ट बोरं ठेवली.





“वा! तोताराम, किती खूष झालेय मी. तुला माहितीये, तू माझा सर्वांत छान मित्र आहेस." बुलबुली म्हणाली.

“खाऊन टाक बोरं. माझं सर्वांत आवडीचं काय विचारशील, तर बोरं. मी आज सकाळपासून खूप जास्त बोरं खाल्ली आहेत."

थोडा वेळ विश्रांती घेऊन, ते पुन्हा चालू लागले. बुलबुली खूप-खूप चालली. तोताराम तिच्या डोक्यावर उडत-उडत, तिच्याशी भरपूर गप्पा मारत राहिला. खूप तासांनंतर बुलबुली खाली बसली आणि म्हणाली, “मला विश्रांती घ्यायची आहे, तोताराम. मी खरंच खूप थकले आहे."

तोतारामनं पुन्हा एकदा मोठ्ठी शीळ घातली. थोड्याच वेळात एक हत्ती डुलत-डुलत त्यांच्या जवळ आला. तोतारामनं बुलबुलीची हत्तीशी ओळख करून दिली आणि त्याला त्यांच्या प्रवासाबद्दल सांगितलं.
हत्ती काळजीच्या स्वरात म्हणाला, “मला वाटतं, आता केवळ माणूसच जंगलातलं युद्ध थांबवू शकेल. एके काळी स्वर्ग असणाऱ्या जंगलामधून आता प्राणी पळून जाऊ लागले आहेत."

“तू बुलबुलीला पाठीवरून नेऊ शकशील?" तोतारामनं विचारलं, “तिची इच्छाशक्ती जबर आहे; पण तिची शक्ती क्षीण होते आहे."



“नक्कीच. ये बेटा, बस. पण मी तुला फक्त रस्त्यापर्यंत नेऊ शकेन. त्यानंतरचा प्रवास तुझा तुलाच करावा लागेल. मला माझ्या कळपापासून फार काळ लांब राहता येणार नाही."

बुलबुलीला हायसं वाटलं. तिच्या नाजूक पायांना विश्रांतीची गरज होती. शिवाय हत्तीच्या पाठीवरून तिला जंगलाचं विहंगम दृश्य दिसत होतं. हत्तीकडे तोतारामप्रमाणेच सांगण्यासाठी अनेक मजेदार किस्से होते. दिवस अगदी सहज निघून गेला. संध्याकाळ होताच तिघांनी एका गुहेचा आसरा घेतला आणि तोताराम आणि हत्तीनं गवत आणि पालापाचोळा गोळा करून बुलबुलीसाठी गादी बनवली. गादीवर पहुडता क्षणीच बुलबुलीला झोप लागली.

तिसऱ्या दिवशी सकाळी तोतारामला बुलबुलीला उठवावंच नाही लागलं. ती स्वतः पहाट फुटताच उठली. तोतारामनं तिच्यासाठी आज जांभळं आणली होती. ती बुलबुलीनं आनंदानं खाल्ली.

बुलबुली, तोताराम आणि हत्ती यांनी त्यांच्या प्रवासाच्या शेवटच्या टप्प्याला सुरुवात केली. बुलबुली अधिकाधिक अधीर होत होती. सुरुवातीला तिच्या मनात विचित्ररूप स्थळाबद्दलची उत्सुकता होती. त्यानंतर तिचं मन जंगलातल्या युद्धाच्या विचारानं  अस्वस्थ झालं. जसजसे ते विचित्ररूप स्थळाजवळ पोहोचू लागले, तसतसं तिचं मन उत्सुकता आणि अधीरता यांनी भरून गेलं. पण युद्धामुळे त्यामध्ये थोडा अस्वस्थपणा होता.



थोड्याच वेळात हत्ती थांबला आणि म्हणाला, “मला तुमचा निरोप घ्यायला हवा. कारण आता मला माझ्या कळपाकडे जायला हवं. तुला जंगलातलं युद्ध थांबवता आलं, तर सगळ्या प्राण्यांवर उपकार होतील. आम्हाला दुसरीकडे कुठेच जाणं सहन होणार नाही. अनेक पिढ्यांपासून हे जंगलच आमचं घर आहे."

इथपर्यंत आणल्याबद्दल हत्तीचे आभार मानताना बुलबुली त्याला म्हणाली, “जंगल माझं ऐकेल, अशी आशा करूयात. मी माझ्या परीने सर्व प्रयत्न करीन."

तोताराम आता बुलबुलीच्या खांद्यावर बसला आणि त्याने तिला सावकाश चालायला सांगितलं, “खाली जाणारा रस्ता बघते आहेस? तो रस्ता जातो, विचित्ररूप स्थळाकडे."

आतापासून, एक विचित्र आवाज जंगलामध्ये घुमू लागला. ते पुढे जात होते, तसतसा तो आवाज वाढत जात होता.
कानांवर हात ठेवत बुलबुलीनं विचारलं, “हा आवाज कुठून येतो आहे?"

“हा जंगलातल्या युद्धाचा आवाज आहे आणि आपण जसजसे विचित्ररूपच्या जवळ जाऊ, तसतसा हा आवाज मोठा होत राहील," तोतारामनं ओरडूनच सांगितलं.



बुलबुलीचा विश्वासच बसेना. तिनं आजवर कधीच असं दृश्य बघितलं नव्हतं. रस्त्यावरून खाली उतरताना तिला दिसणारी प्रत्येक गोष्ट असामान्य होती. परंतु तो आवाज मात्र कानठळ्या बसवणारा होता. तोतारामनं बुलबुलीचं लक्ष वेधण्यासाठी तिच्या कानाशी चोचीनं टोचलं. जंगलातल्या गलक्यामुळे बुलबुलीला तोतारामचा आवाजच येत नव्हता. काही पावलांनंतरच, बुलबुली एका सपाट प्रदेशात पोहोचली. जणू काही जंगलातली सर्व झाडं अचानक गायब झाली होती. तिची नजर जाईल, तिथवर केवळ पर्वतरांगा दिसत होत्या.

“हे आहे विचित्ररूप स्थळ. या ठिकाणी सगळंच विचित्र आहे. मनुष्यप्राणी फार क्वचित इथवर येतात." तोताराम म्हणाला.

आता तोतारामनं ओरडायला सुरुवात केली, “ऐका, ऐका... जंगलामध्ये मनुष्यप्राणी आला आहे! माणूस आला आहे!" पण कान बधीर करणाऱ्या जंगलातल्या आवाजांमध्ये तोतारामचा आवाज कुणीच ऐकला नाही.

बुलबुलीला कानांवरचे हात काढणं शक्य होत नव्हतं. जंगलाचं बोलणं तिला ऐकूच येत नव्हतं. परंतु, आत्तापर्यंत तिच्या हे लक्षात आलं, की त्या ठिकाणामध्ये एकूण तीन जंगलांचा समावेश आहे.



तिच्या पुढे, थोड्याच अंतरावर तिला गवताचे हिरवेगार गालिचे दिसत होते. तिच्या उजव्या बाजूला नारिंगी रंगाच्या फुलांचे शेकडो ताटवे होते आणि तिच्या डावीकडे उंचच उंच वृक्ष. तिला दिसणारं दृश्य श्वास रोखून धरणारं होतं आणि येणारे सुगंध तर अविस्मरणीयच.

बुलबुलीचा चेहरा आश्चर्यानं फुलून गेला. प्रत्येक जंगलाकडे ती वारंवार वळून पाहात राहिली. त्यांचं सौंदर्य डोळ्यांत साठवत राहिली.

अचानक जंगलांमधला आवाज क्षीण होत गेला. जंगलांनी जणू काही तिला पाहिलं. आता कुठे बुलबुलीनं त्या ठिकाणी पहिला दीर्घ श्वास घेतला. तिला चहाचा वास आला. पुढच्या श्वासागणिक ती तिच्या उजवीकडे खेचली गेली. तो कुठलासा उग्र मसाल्याचा वास होता.

तिच्या ओळखीचा. साशंकपणे पुन्हा एकदा श्वास घेतल्यावर तिला समजलं, “अरे, ही तर वेलची."



वाऱ्याच्या एका हलक्या झुळकेसरशी ती डावीकडे गेली. तिनं हसून वळून पाहिलं आणि पुन्हा एकदा मोठ्ठा श्वास घेतला. तो एक ताजा आणि आकर्षक सुवास होता. तिनं चटकन ओळखलं. हातानं सादर नमस्कार करून बुलबुली म्हणाली, “ही तर तुळस आहे!"

त्या सर्व सुवासांमुळे बुलबुली खूष झाली. एकाच स्वराच्या तीन सप्तकांप्रमाणे हे तीन सुवास होते. सा... सा... सा...
बुलबुलीला फार उत्साह वाटला. तिनं हात हवेत पसरून, डोळे मिटून गिरक्या घेतल्या. सुगंध आणि संगीत तिच्या मनात सतत वाजत राहिलं. तिची सगळी ज्ञानेंद्रियं जागी झाली.

तिच्यासाठी हा ‘जादुई’ क्षण होता. इतका आनंद तिला पूर्वी कधीच झाला नव्हता. त्याचवेळी वेलचीचं रोप म्हणालं “कदाचित ही छोटी मुलगी त्या चहाच्या रोपट्यांना शिक्षा देऊ शकेल."



“हो बहुधा. बाई गं, तू त्या चहाच्या रोपांना आमचा सुगंध चोरण्यापासून रोखू शकशील?" तुळशीनं विचारलं.

जंगलांना तिच्याशी बोलताना ऐकून बुलबुलीला आश्चर्य वाटलं. ती काही बोलणार, इतक्यात चहाचं रोपटं म्हणालं, “हे दोघं नसते, तर माणसानं आमच्या सुगंधाचा आनंद लुटला असता."

बुलबुलीनं आश्चर्यानं त्यांना विचारलं, “तुमचा सुगंध चोरीला जाण्याच्या भीतीपोटी हे युद्ध सुरू झालं आहे का?" ती स्वतःशीच हसली.

“मी जिथे उभी आहे, तिथे तुमचा वास कसा येतो आहे, याची तुम्हाला कल्पना तरी आहे का? मी तुमच्या तिघांचाही वास घेऊ शकते."



“यात आमचा काहीच दोष नाही. आमच्या आजूबाजूला जे वाढतं, त्या सर्वांचा वास आमच्या पानांना येतो. खरं म्हणजे, तुळस आणि वेलची बाजूला असल्यामुळे आम्हाला आमचा वास टिकवण्यासाठी जास्तच कष्ट करावे लागतात. तुळस आणि वेलचीच्या जंगलांचा वास आम्ही चोरला आहे, असं मुळीच नाही. तू आत्ताच म्हणालीस ना, तुला त्यांचा देखील वास येतो आहे," चहाचं रोपटं म्हणालं.

बुलबुलीनं बराच वेळ दीर्घ श्वास घेतला आणि ती शांत झाली. ज्या-ज्या वेळी ती चहा, तुळस आणि वेलचीचा एकत्र वास घेत होती, त्या-त्या वेळी तिला शांत वाटत होतं. त्या तिघांच्या एकत्र वासामध्ये शांत करण्याचा कुठलासा गुणधर्म होता.



“माझ्या आईनं मला वेदांमधल्या काही गोष्टी शिकवल्या आहेत. तुम्हाला माहिती आहेत?", बुलबुलीनं विचारलं आणि ती पुढे म्हणाली, “सूर्य, आकाश, झाडं, रोपं या सर्वांनी आनंद द्यायला हवा आणि या सर्वांनी मन:शांती द्यायला हवी. तुम्ही सगळे असं करताय का?" सगळी जंगलं शांत बसून बुलबुलीचं म्हणणं ऐकत होती.

बुलबुलीला एक कल्पना सुचली. तिनं तोतारामच्या कानात काही सांगितलं आणि तो चटकन तिच्या खांद्यावरून उडून गेला. तुळशीचं रोप म्हणालं, “तुळस आणि वेलची रानटी आहेत. आमच्या वाढीवर आमचं नियंत्रण नाही आणि कुठल्या दिशेला वाहायचं, हे आम्ही वाऱ्याला सांगूही शकत नाही."

बुलबुलीनं क्षणभर विचार करून विचारलं, “मग, तुम्ही चहावर चोरीचा आरोप कसा लावता? तुम्ही तर वाऱ्याला दोष द्यायला हवा."

“वारा! तुळस आणि वेलचीची जंगलं वाऱ्याशीसुद्धा सतत भांडत असतात. वाऱ्याने त्यांचा सुगंध इथून कुठेही नेलेला त्यांना आवडत नाही," चहाचं झुडूप म्हणालं.



बुलबुली हतबुद्ध झाली. तिनं विचारलं, “हे खरं आहे का?"

दोषी जंगलांपैकी कोणी काहीच उत्तर दिलं नाही. बुलबुलीनं निःश्वास टाकला, त्याच वेळी तोताराम परत आला. त्यानं चोचीतून आणलेली काही तुळशीची पानं, वेलची आणि चहाची पानं तिच्या हातात दिली.

बुलबुलीनं हलक्या हातानं ती चोळली आणि वास घेतला. त्याबरोबरच तिनं आनंदाचा आणि समाधानाचा एक उद्गार काढला. सर्व जंगलांनी एकदम विचारलं, “काय झालं, मुली? तू ठीक आहेस ना?"



बुलबुली आनंदानं हसू लागली आणि म्हणाली, “तुम्ही आता शांततेचं सफेद निशाण फडकावू शकता. माझ्या हातामध्ये तुम्ही तिघंही आहात आणि तुमच्या तिघांचा एकत्रित येणारा वास जगातला अद्वितीय वास आहे. तुमच्या तिघांच्या मिश्रणाचा एकत्रित वास किती सुखद आहे!"

तोताराम बुलबुलीच्या कानात कुजबुजला. ती हसली.

“तोताराम मला सांगतो आहे, की तब्येत बरी नसली, की तुमच्यापैकी कोणाला खायचं, याचं ज्ञान जंगलातल्या प्राण्यांना आहे. पक्ष्यांनी सुद्धा तुमची फळं आणि पानं खाल्ली आहेत आणि तुम्ही त्यांना किती पटकन बरं करता, हे त्यांनाही माहिती आहे. तुम्हाला हे माहिती तरी होतं का?," बुलबुलीनं विचारलं.



“हे प्राणी सर्व प्रकारचे आजार बरे करण्यासाठी तुमची पानं खातात. स्वतःला ताजंतवानं करण्यासाठी ते या विचित्ररूप स्थळाकडे येतात. तोताराम, मला थोडीशी तुळस, वेलची आणि चहा दे बरं. मी घरी गेल्यावर माझ्या आईसाठी मस्तपैकी चहा बनवणार आहे, तुळस आणि वेलची घालून. जंगलांचा विजय असो! आता संपूर्ण जगाला कळेल... तुम्ही तिघं एकत्रितपणे किती चविष्ट लागता! याचा अर्थ असा, की तुमची एकमेकांशी मैत्री व्हायला हवी, जमेल?" बुलबुलीनं विचारलं.

बुलबुली आणि तोताराम खुदूखुदू हसले, त्याप्रमाणेच जंगलंही हसली. आतासुद्धा मोठ्ठा आवाज येऊ लागला. पण हा आवाज भांडणाचा नव्हे, हसण्याचा होता. बुलबुलीला युद्ध संपताना बघून आनंद झाला. प्रत्येक जंगलाला आता स्वतःच्या गुणांचा अभिमान वाटत होता.

बुलबुलीनं तोतारामला चहा, तुळस आणि वेलची गोळा करायला सांगितलं. “जंगलांनो, आता मी माझ्या गावात परत जाणार आहे आणि जाताना तुळस आणि वेलची घातलेला अप्रतिम चहा बनवण्याची पद्धती घेऊन जाणार आहे. मी माझ्या गावातल्या लोकांना या स्थळाकडे घेऊन येण्याचं वचन देते. विचित्ररूप स्थळ - पृथ्वीतलावरचं सर्वांत उत्साहवर्धक ठिकाण होईल." तर दोस्तांनो, असा शोध लागला-तुळस आणि वेलचीची चव असलेल्या चहाचा. तुम्ही कधी असा चहा प्यायला आहे?

## Story Attribution:

This story: मसाला चहा is translated by Sucheta Kadethankar . The © for this translation lies with Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Based on Original story: 'Jungle Brew', by Tanya Luther Agarwal . © Pratham Books , 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

## Other Credits:

This book has been published on StoryWeaver by Pratham Books. The development and production of the print version of 'Jungle Brew' has been supported by Tim Talkington. Pratham Books is a not-for-profit organization that publishes books in multiple Indian languages to promote reading among children. www.prathambooks.org

## Illustration Attributions:

Cover page: Girl sitting on elephant, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 2: A house in the forest, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 3: Girl on a tree and flying bird, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 4: Girl on a rock talking to a parrot, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 5: Girl in the farm, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 6: Teacher taking class under the tree, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 7: Worried girl talking to parrot, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 8: Girl looking at crow, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 9: Girl looking at crow, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 10: Girl running down a slope with parrot, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.

Illustration Attributions:

Page 11: Girl drinking coconut water, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 12: Girl walking up a hill , by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 13: Girl and parrot near a stream, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 14: Girl looking at elephant and parrot, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 15: Girl, elephant and parrot in the hills, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 16: Girl near an elephant, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 17: Girl and parrot in the hills, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 18: Girl admiring flowers, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 19: Girl sitting down in the field, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 20: Girl smelling the mountain air, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 21: Happy girl in a field, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license. Page 22: Parrot and girl talking in the field, by Sanjay Sarkar © Pratham Books, 2010. Some rights reserved. Released under CC BY 4.0 license.





# मसाला चहा

(Marathi)

जंगलातल्या त्या अद्भुत विचित्ररूप ठिकाणाविषयी बुलबुलीनं खूप ऐकलं होतं. लोक त्याविषयी सतत बोलत, पण तिथे गेलं मात्र कुणीच नव्हतं. तिथे जाताना, बुलबुलीच्या सोबतीला होता फक्त तोताराम. तिच्या आयुष्यातलं ते सर्वात मोठं साहस ठरणार का?

या पुस्तकाची वाचन पातळी ४ आहे. आत्मविश्वासाने, ओघवते वाचन करणाऱ्या मुलांसाठी.

